ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति म्हणे शक्तींसी । पाहून महाशांतियुक्त कामासुरासी । सुरर्षींच्या चित्तासी । विस्मय फार जाहला ।।१।। विकटास पूजून ते जोडिती । आपुले कर ते भावभक्ती । देव ऋषि त्यास विनविती । स्तोत्र उत्तम गाऊनिया ।।२।। जन्म रहित प्राचीन अव्यय । सदा आत्मरूप सकलावभासमय । असद्विहीन विविध अंतरस्थ सदय । त्या विकटा परेशा भजतो आम्हीं ।।३।। जयासी आदिमध्य अन्त नाहीं । सुजीवन जें जीवनधर्मधारवाही । सदा अमृत ब्रह्मविकारहीन प्रत्यहीं । माया विकटा परेशा भजतों आम्हीं ।।४।। आपणच स्वबिंबापासून । माया रचून देई स्वयं प्रसन्न । जीवन बिंबवीर्य ती करी तैं पूजन । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।५।। जैसें असद्रूपमय सांख्य रचित । तैसेंच ब्रह्म सुबोधरूपयुक्त । अनंतभेदाश्रित अप्रमेय सतत । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।६।। तदनंतर स्वबोधानें सोऽहंकृत । आदिरूप पवित्र एकाश्रित । जगत्धर बिंदुमय पुनीत । त्या परेशा विकटा भजतों आम्ही ।।७।। चतुष्पादमय जें जगत । व्यष्टी समष्टीनें जें युग निर्मित । अजात संजीवनप्रद गणेश असत । त्या परेशा

मु. पु. खंड. ६ अ. ३५-३६

विकटा भजतों आम्हीं ।।८।। नाथा भेदविहीनभावें संतत । जग हें सारें तूं पसरवित । प्रकाशरूप अनंत लीला करित । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।९।। अजन्मा असली तूं गजानन । तथापि सर्वत्र तुझें होत दर्शन । भक्तीनें गम्य विकट नामें संपन्न । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१०।। विष्णुस्वरूपें ह्या जगा रक्षिसी । विनायका रजोगुणें सृजिसी । तमोयुक्ततेनें ह्यास संहारिसी । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।११।। कर्में सारी निर्मून । संजीवनरुपें त्यांचें नियमन । क्रियास्वरुपें शक्तिसंपन्न । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१२।। आत्मरुपें ढुंढिराजा सदा । विश्वंभरा विश्वमूर्ते सौख्यदा । तुज जगीं प्रवेश कैसा मोहदा । त्या विकटा परेशा भजतों आम्हीं ।।१३।। सर्वदा आदिपूज्य सकल वंदित । गणेश सिध्दिप्रद आसमंतांत । सुचित्तभास कर्माधार वर्तत । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१४।। स्वानंद नाम नगरांत । जो त्रिनेत्रयुक्त सुस्थित । मूषकवाहन महोदर विभूप एकदंत । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१५।। विराजे जो स्वभक्तपक्षांत । असे विघ्नविहीन मनेप्सित । अभक्ताचें सर्वस्व नष्ट करित । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१६।। नियंतृरुपें तुझ्या करांत । नानाविध ब्रह्मीं तैसें जगांत । महाअंकुश ऐसा एकला धरित । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१७।। भ्रमात्मक जें एक बंधन । तो परशु तुझ्या करीं विराजमान । करिसी हनन स्वभक्तांचें बंधन । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१८।। जे सर्वदा तुझा आश्रय घेत । त्यांना सत्वर अभय दावित । तुज त्यागिती दुष्ट ते भय पावत । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।१९।। निजामृत विघ्नपातें जें अन्न । सर्वत्र जगांत असे पावन। तें मोदक प्रतीकानें हस्तग मोदकर शोभन । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।२०।। सर्वगता विभिन्न असन्मयी ।

परी ती माया तुझ्यांत शांतिमयी । म्हणोनि जन विकट म्हणती विनयी । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।२१।। आम्हीं अल्पमति काय स्तवित । जेथ निगमादिक झाले असमर्थ । शुकादींसही स्तवनातीत । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।२२।। तथापि तुझ्या दर्शनानें प्राप्त। बोध ब्रह्मेशा जो आम्हांप्रत । त्यानें रचिलें दीनपाला हो संतुष्ट । त्या परेशा विकटा भजतों आम्हीं ।।२३।। आदिशक्ति नंतर सांगत । ऐशी स्तुति करुन विकटाप्रत । प्रणाम घालिती साष्टांग विनत । सर्व सुरर्षी नाचती ।।२४।। तेव्हां महादेवींनो तो विकट । सर्वेश भक्तियंत्रित । देवर्षींना त्या भक्तवात्सल्यें म्हणत । भक्तिसंयुतांसी प्रभू ।।२५।। देवांनों मुनिसत्तमांनो सांप्रत । वर मागा जो असेल इच्छित । स्तोत्रें संतुष्ट मीं तो त्वरित । देईन तुम्हां भक्तियुक्तांसी ।।२६।। हें तुम्हीं रचिलेलें स्तोत्र मत्पदप्रद । होईल पाठका वाचका सुखद । भुक्तिमुक्तिप्रद पुत्रपौत्रद। धनधान्यादिक काम पुरवी ।।२७।। षट्‌कर्म साधनकर । परकृत्य विनाशक थोर । सेवकांसी नाना रोगहर । पूर्णानंदप्रदायक ।।२८।। जे असतील कारावासांत । त्यांची सुटका होईल त्वरित । सहस्रावर्तन जरी करित । तरी सौभाग्य वाढेल ।।२९।। नाना पापसमूहांचें दाहक। वाचनें सर्व सिध्दिप्रदायक । होईल निःसंशय सुखकारक । स्तोत्र हें सर्वदा सर्वकाळ ।।३०।। निरंतर प्रतिदिवस वाचील । स्तोत्र हें एकवीस वेळा विमल । त्याचे सर्व काम पूर्ण होतील । एकवीस दिवस क्रमें वाचितां ।।३१।। ऐसें विकटाचें वाक्य ऐकून । देवर्षि उत्तम करिती वंदन । शक्तींनो ते म्हणती वचन । विनयनम्र भक्तीनें ।।३२।। गजानना कामासुरास शांत । महावीरास तूं केलेंस सांप्रत । तें पाहून कृत्य अद्भुत। संतुष्ट झालों सर्व आम्हीं ।।३३।। आतां द्विजादिक कर्मपर । देव स्वपदीं स्थिर । स्वधर्मयुक्त जन उदार । होतील आतां जगांत ।।३४।। वरदानें

जें साधणार । तें तें आधींच मोदकर । होतां इच्छित पूर्ण सत्वर । आणखी काय मागावें ।।३५।। परी आतां एकचि मागणें । स्थिर भक्तीचें द्यावें लेणें । कामभय नष्ट होय जेणें । तथाऽस्तु म्हणे विकट तेव्हां ।।३६।। विकट अन्तर्धान पावला । देवर्षीस खेद झाला । देवाचा विरह कोणाला। दुःखद होणार नाहीं जगीं? ।।३७।। तदनंतर मुनिगणाहस्तें स्थापित। विकटमूर्ति देव मुदित । आनंददायक मूर्ति प्रख्यात । हिमाचलप्रांतीं तें स्थान ।।३८।। वायुदिशेंत तेथ विलसत । विकटाचें तें स्थान पुनीत। महादेवींनो सर्वसिद्धि देत । पूजकांसी सर्वदा ।।३९।। देवऋषि मूर्ति स्थापून । पूजा यथाविधि करून । आपापल्या स्थानीं जाऊन । पुनरपि परतले क्षेत्रांत या ।।४०।। अंशानें आपुल्या अधिकारक्षेत्रांत । राहती देवर्षी कार्यरत । पूर्ण भावें त्या क्षेत्रांत । राहून भजती विकटासी ।।४१।। चौकोनी तें महाक्षेत्र । दशयोजनें त्याचा विस्तार सर्वत्र । तेथ मध्यभागीं पवित्र । साक्षात् विकट विलसत असे ।।४२।। चार दिशांत चार देव। शंभु विष्णु शक्ति सूर्य अभिनव । अन्य देव भूषविती वामभाग अपूर्व। उजव्या बाजूस मुनिजन ।।४३।। क्षेत्रयुक्त तीर्थ पश्चिमेस । पुढ्यांत भक्तजन सेवेस । उपस्थित मूषक वाहक त्यास । स्थापिती तेव्हां देवगण ।।४४।। वामांगीं सिद्धि वसत। दक्षिणांगीं बुद्धि सेवित । ब्रह्मप्रिय गण सर्व स्थित । शस्त्रधर विकटप्रिय ।।४५।। तेथ विकटतीर्थ विख्यात। त्यांत स्नानमात्रें ईप्सित । लाभती प्राणिमात्र त्वरित । अन्तीं मुक्ति लाभतसे ।।४६।। स्वानंदांत मिळे स्थान। ऐसें हें विकटप्रिय तीर्थ पावन। त्रैलोक्यांत विश्रुत महान । ऐसा पूर्ववृत्तान्त हा ।।४७।। अन्यही तीर्थमुख्यें वसत । देवर्षीच्या समंतात । विकटक्षेत्रीं जीं स्नानकर्मे होत। सुखप्रद भक्तांसी ।।४८।। अन्य देवांचें जे नर भक्त । मृत्यु पावतील या क्षेत्रांत । तेही विकटाच्या लोकीं जात । हें निश्चित जाणावें ।।४९।।

तेथ भोग अमित भोगिती । अन्तीं स्वानंदांत लय पावती । विकटदर्शनानें होती । ब्रह्मभूत ते सारे ।।५०।। भाद्रपद शुक्ल चतुर्थी तिथी । त्या दिनीं मूर्ति स्थापिती । विकटाची म्हणोनि जगतीं । ती तिथि मुख्यत्व पावली ।।५१।। त्या तिथीस महोत्सव करिती । प्रतिवार्षिक भावभक्ती । माध्यान्ह काळीं पूजिती । सर्वसिद्धिप्रदायकासी ।।५२।। स्वल्प सिद्धिद आद्य हें व्रत । जाणावें शास्त्रसंमत । धन्य ते लोक जगांत। जे पाहती विकटासी ।।५३।। ते कृतकृत्य होत । ऐसें वचन वेदांदीत। तेथ देवर्षी नाना वसत । क्षेत्रांत भजती जे विकटासी ।।५४।। नित्य हर्षयुक्त मनें भजती । विकटाचीं चरित्रें वर्णिती । आनंदाश्रू नयनीं दाटती। रोमांच उठती अंगावरी ।।५५।। नरदेह अपूर्व लाभून । विकटाचें दर्शन न घेती जें जन । त्यांचें निष्फळ असे जीवन । पशुतुल्यस्वभाव ते ।।५६।। ऐसें हे क्षेत्रसंभव महिमान । कथिलें संक्षेपें पावन । जरी वर्णीन विस्तारें करून । तरी अयुत वर्षेंही न पुरतील ।।५७।। वर्षकोटी जरी वर्णिती । अन्य देवमुख्य योगी जगती । तरी तेही समर्थ न होती । विकटक्षेत्र वर्णन करण्या ।।५८।। ऐसे नाना अवतार घेत । धर्मधर प्रभु चराचर रक्षित । कलांशानें विकट श्रेष्ठ । देवींनों हें रहस्य जाणा ।।५९।। हें विकटाचें महिमान । जो वाचील करील श्रवण । त्यास सर्व ऐहिक फळ लाभून । अंतीं ब्रह्ममय तो होईल ।।६०।। त्यास कामासुराचें भय न बाधत । कामहीन स्वभावें होत । विशेष सुखद काम लाभत । ऐसें माहात्म्य विकटाचें ।।६१।। ऐशापरी कामास वश करून । शांत करी त्यास गजानन । विकट गणेश हें पावन । कथानक तुम्हां सांगितलें ।।६२।। आतां आणखी काय ऐकण्यास । इच्छा असे तुमच्या चित्तास । तें सांगा तुम्हीं मज या समयास । पुरवीन तुमची मनःकामना ।।६३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे

विकटचरिते विकटावतारचरितसमाप्तिवर्णनं नाम षट्त्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय छत्तिसांवा संपूर्ण)